

MR. K. D. JAWKAR
श्री. के. डी. जावकर



## BAL GANDHARVA. श्रीयुत बालगंधर्व.

श्रीयुत बालगंधर्व यांची नव्यानें ओळख करून देणें म्हणजे सूर्याचा प्रकाश पांढरा असतो म्हणून सांगणें होय. गेलीं दोन तपें मराठी रंगभूमीवर आपल्या गायन-नैपुण्यानें महाराष्ट्र रसिकांस त्यांनीं केवळ वेड लाविलें आहे. गंधर्वांच्या गाण्याचें सर्वत्र अनुकरण होत असून तो एक पंथच निघाला आहे असें म्हणावयास हरकत नाहीं. यांच्या पूर्वींच्या सर्व नाटकांतील पदांचे रेकार्ड अत्यंत लोकप्रिय आहेतच. पुढील नवीन पदांचे रेकार्ड विक्रीस तयार आहेत.

BX.435 21-12802

P 8738 | भक्तीभाव हा घ्या सेवा | मेनका | ( काफी )
P ८७३८ | सन्निध जी सेवा, सेवा तीच | ,, | ( शंकरा )

436 03

एक बाजू:—भक्तिभाव हा, घ्या सेवा; रुचिर रूप तपवनांत तापवा; गोड गोड मज बोलवा ॥ अमर कलांसि मम देह धरी, सत्य सत्य त्या राबवा ॥

दुसरी बाजू:—सन्निध जी सेवा सेवा तीच सुखदा विरही जनाला ॥ सौख्य असें विमला करा, सहजचि मारा मग विरहाला ॥

या दोन्ही पदांनीं मेनका विश्वामित्रास आश्रमांत ठेवून घेण्यास विनंती करीत आहे.

श्रीयुत बालगंधर्व हीं पदें सुस्वर रीतीनें गात असतांना रसिक तल्लीन होऊन जातात.

BX.432 21-12804

P 8739 | प्रियकर वश मजला | मेनका | ( बागेश्री )
P ८७३९ | सत्य, सत्य नच, फोल पाला | ,, | ( विहाग )

434 05

एक बाजू:—प्रियकर वश मजला; विमल यश हेंचि, गुरुपदा देह चढला ॥ स्त्रीपुरुषा गुरुता वेता । विरह-कलह मग शांत जाहला ॥

BAL GANDHARVA (*Continued.*) बालगंधर्व (चाल.)

दुसरी बाजूः—सत्य, सत्य नच, फोल पाला; जरि नच सत्यें सौख्या गेला ॥
सुख फल सत्या नियमें आलें, तप झालें सुखसाधन मजला ॥

मेनकेंतील गंधर्वाची ही पदें फार लोकप्रिय झालीं आहेत.

BX.433 21–12806
P 8740 } भूषण संसारा मेनका (भीमपलास)
P ८७४० } इथेंच थारा पराक्रमाला " (गजल)
444 07

पहिली बाजूः—भूषण संसारा, विमला-वनिता-वश जरि जीव पसारा ॥ प्रेमळ जीवन या अधिकारा जीव पोचतां, मोक्षचि दुसरा ॥

दुसरी बाजूः—इथेंची थारा पराक्रमाला; म्हणोनि देवा जन्म आला ॥ परोपकार सुखीच झाला, तनूस झिजवीत जगांत ठेला; तो शिकवितो या सेवेला ॥

गंधर्व ही दोन्ही पदें मनोहर रीतीनें म्हणत असतांना गानप्रिय लोक फार आवडीनें एकतात.

BX437 21–12808
P 8741 } देहा विसरलें मेनका (भैरवी)
P ८७४१ } अजि पुरवा ही हौस " (जीवनपुरी)
438 09

पहिली बाजूः—देहा विसरलें नच; मग सुख जाणा हीन वासना ॥ अभ्यास सतत सकलहि केला, डोल फोल न कळत पळाला, देहसंग परि बुद्धि सोडिना ॥

दुसरी बाजूः—अजि पुरवा ही हौस प्रियकरा, मातृपदीं तनु मम बसवा ॥ स्त्री जगाला स्त्रीच विधाता; होत नाहीं जरि माता, विश्व-मुखीं विष कालवा ॥



BAL GANDHARVA (*Continued.*) बालगंधर्व (चाल.)

BX. 361 21–12810
P 8742 } किती सांगू तुला सौभद्र (आनंदभैरवी)
P ८७४२ } उगीच कां कांता मूकनायक
364 11

पहिली बाजूः—किती सांगू तुला मज चैन नसे ॥ ध्रु० ॥ हें दुःख तरी मी साहूं कसें। या समयीं मला नच कोणी पुसे। हा विरह सखे मज भाजितसे ॥ ॥ चाल ॥ मन कसें आवरूं। किती धीर धरूं। कसें करूं ॥ हे बंधू नव्हत मम वैरी खरे। दाविती कसें वरी प्रेम वरें। बोलोनि पाडिती हृदयासी घरें ॥ चाल ॥ नको नको मला जीव। विष तरी पाजिव ॥

दुसरी बाजूः—उगिच कां कांता गांजितां दासी दीना ॥ ध्रु० ॥ व्यापुनियां सारी धरणी। मूर्ति आपुली या नयनीं। खेळते पहा दिनरजनीं। तेवि हृदय मंचकिं लीना ॥

MASTER KRISHNA. मास्तर कृष्णा.

सुप्रसिद्ध संगीताचार्य कै. भास्करबुवांचे नामांकित शिष्य श्री. कृष्णराव फुलंब्रीकर हे गंधर्व नाटक मंडळींत असून गायनकलाविशारद आहेत. बैठकीचें गाणेंही शास्त्रोक्त रीतीनें गाणारे हे एवढे नट आहेत. कृष्णराव उर्फ मास्तर कृष्णा त्यांचें गायन रसिकांना फारच प्रिय असते.

त्यांच्या पदांचीं खालीं दिलेलीं रेकार्डे विक्रीस तयार आहेत.

BX.368 21–12812
P 8743 } कुसुमा विधि चारुकांत नंदकुमार (यमन)
P ८७४३ } भाग्यवती भुवनांत ललना " (पहाडी)
374 13

पहिली बाजूः—कुसुमा विधी चारुकांत। निर्मी आमोद शांत। परि नाशा त्या संगें कीटकासि मूढ गर्जित ॥ ध्रु० ॥ अखिल भुवन भूषणा प्रेरि जगतीं नरवरासि। दनुज तया, कां न कळे, नाशाया मग निर्मित ॥

## MASTER KRISHNA (*Continued.*) मास्तर कृष्णा (चालू.)

दुसरी बाजू:—भाग्यवती भुवनांत ललना । तुज सम बहु धन्या दिसेना ॥ धृ ॥ निरखोनी जया विश्व सुधा वरि । दे तुज तो स्वमना सुमना ॥ चिर सहवासा घे रमणाच्या । निरवधि सुख सदना वरेण्या ॥

BX 370 21-12814

P 8744 / P ८७४४ — अवधि न भाग्यबलाते — नंदकुमार (देसकार)
तारावया जन पातला — ,, (करहरप्रिया)

371 15

पहिली बाजू:—अवधि न भाग्यबलातें । द्वेषपात्र मलिन गात्र हतललना अमराधिपा मधुरा ॥ धृ ॥ योगें स्वाति समर्थी घनजले शुक्ति पुटीं जन्मती सतेजा मुक्ता प्रखरा ॥ १ ॥

दुसरी बाजू:—तारावया जन पातला हा । परि शल्यसा हो कुजनास ॥ धृ ॥ सुरनंदना सुखदा त्यजोनी अध सेविते नारकवास ॥ १ ॥

## MR. PENDHARKAR. श्रीयुत पेंढारकर.

कै. केशवराव भोसले यांचें पाठीमागें श्री. पेंढारकर यांनीं ललितकला नाटक मंडळी आपल्या गायन नैपुण्यानें चालविली आहे. जोरदार आवाज व शास्त्रीय पद्धतीचें गायन यामुळें पेंढारकरांचे गाणें लोकांना फार आवडतें.

चालू महिन्यात पुढील पदांचे रेकार्ड विक्रीस तयार आहे.

BX 473 21-12816

P 8745 / P ८७४५ — गाढ झोंप घेशी करुणा — कृष्णार्जुनयुद्ध (केरवा)
हरिला झणिं वदा — ,, (त्रिवट)

482 17

पहिली बाजू:—गाढ झोंप घेसी करुणा घना । सोडि तियेते ॥ स्थापुनि अहिशिरीं विश्वकटाहा । पेटविलें कलिकालानी घना । सोडी जलातें ॥ १ ॥

दुसरी बाजू:—हरिला झणीं वदा । जा । जी मम अपकीर्ती हो जगीं ती ॥ धृ ॥ सुज्ञ तुम्ही या नणदा जावा मुठींत ठेवितां नवऱ्या भावां । मग न कलह कां भिटला जावा ॥ १ ॥



## MR. PATWARDHAN. श्रीयुत पटवर्धन.

श्रीयुत पटवर्धन हे गंधर्व नाटक मंडळींतील प्रमुख नट आहेत. शास्त्रीय पद्धतीचें गाणें जर ऐकावयाचें असेल तर तें श्रीयुत पटवर्धनांचेंच ऐकावें. गांधर्व महाविद्यालयांत गायन शास्त्राचें अध्ययन त्यांनीं केलें असल्यामुळें त्यांचे गायनास अपूर्व रंग चढतो.

यांच्या पुढील नवीन पदांचे रेकार्ड विक्रीस तयार आहेत.

BL 870 21-12818

P 8746 / P ८७४६ — कुटिल हेतू तुझा फसला — संशयकल्लोळ
स्वकर शपथ वचनीं — ,,

BX 393 19

एक बाजू:—कुटिल हेतू तुझा फसला । निजपाशीं मज बांधायाचा ॥ धृ० ॥ महा घोर मरणांतुनी सुटलों । उरी विषारी नेत्रभल्ल हा होता घुसला ॥ १ ॥

दुसरी बाजू:—स्वकर शपथ वचनीं वाहिला । उगिच कां तुवां । निज तनू दिधली मला, तो काय पोरखेळ नवा ॥ धृ० ॥ पसरिली माया लटकीच कां ती । वरिलें मग कां करूनि साक्षी माधवा ॥ १ ॥

## MASTER VISHNU. मास्तर विष्णू.

सुप्रसिद्ध गंधर्व नाटक मंडळींतील हे नावाजलेले होतकरू नट आहेत. यांचें गाणे अभिनयपूर्ण व सुरेल असते.

या महिन्यांत मास्तर विष्णू यांच्या नवीन पदांचे रेकार्ड विक्रीस तयार आहे.

BX 384 21-12820

P 8747 / P ८७४७ — फुललें जग अजि नाचता — मेनका (पहाडी)
मदन सजविला वसंत आला — ,, (काफी)

446 21

पहिली बाजू:—फुललें जग अजि नाचतां ॥ धृ० ॥ नव लतिकेला नव नव शोभा ही आतां । फळांफुलांना लुसलुशिता ॥

## MASTER VISHNU (*Continued.*) मास्तर विष्णू (चालू)

दुसरी बाजू:—मदन सजिविला वसंत आला, छुमछुम नाचे नाजुक अबला ॥ धृ० ॥
यम जरि टपला, चंचल चपला, नाचत नाचत चुकवी तयाला ॥

वरील दोन्ही पदें मेनका नाटकांतील आहेत. मास्तर विष्णू हीं पदें फार बहारीनें म्हणतात.

BX. 386 — 21–12822

P 8748 / P ८७४८ — सुख सदा सुख सदा — मेनका (पिलू)
संतोष वाढला हसविला — ,, (खमाज)

387 — 23

पहिली बाजू:—सुख सदा सुख सदा नाचतां; इंद्रसभेला शोभा आतां ॥ धृ० ॥
दिव्य देवसम नर सजता । सुरसम लीला मानवाला सुलभ, तयाला नाचवितां ॥

दुसरी बाजू:—संतोष वाढला हसविला प्रियकर, मधुर मधुर हासविला ॥ धृ० ॥
रुचिर मन तृप्तचि दावी, तुष्टी पुष्टी मग देहाला ॥

## MR. K. D. JAWKAR. श्री. के. डी. जावकर.

श्रीयुत जावकर हे चांगले नामांकित होतकरू गवई असून त्यांचीं पुढील दोन भक्तिरस प्रधान पद्यें पुढील रेकार्डांत असून तीं विक्रीस तयार आहेत.

BX. 75 — 21–12824

P 8749 / P ८७४९ — जय गणेश गणनाथ — भजन
ध्यावा मनीं गुरुदत्त — ,,

78 — 25

एक बाजू:—जय गणेश गणनाथ दयानिधी । सकल विघन कर दूर हमारे ॥ लंबोदर गजवदन मनोहर । कर त्रिशूल दया परशूवर धारे ब्रह्मादिक शूर ज्या वश म्हणती । ऋषी मुनी जन गण सब दास तुमारे ॥

दुसरी बाजू:—ध्यावा मनीं गुरु दत्त निरंजन । अनुसूयात्मज देव दयाघन ॥ ब्रह्मा विष्णू महेश मिळूनी । अवतरलों त्रयमूर्ति त्रिभुवनीं. तीतें ध्यातां गातां निशिदिनीं । नेईल मोक्ष पदातें ॥



## PHULAJI BOA. श्रीयुत फुलाजी बोवा.

श्रीयुत फुलाजी बोवा यांचीं पुढील दोन भक्तीरसात्मक पद्यें रेकार्ड केली असून विक्रीस तयार आहेत.

BX. 25 — 21–12826

P 8750 / P ८७५० — संत पदाची — भजन
देखिला श्रीहरी — ,,

26 — 27

पहिली बाजू:—संतपदाची जोड । दे हरी साधू पदाची जोड । संत समागम आत्महिताचा, सुंदर उगवे मोड । सुफलित करुनी पूर्ण मनोरथ, पुरविसी जिवीचे कोड । अमृतराय म्हणे हरि, भक्तांचा शेवट करिशी गोड ॥

दुसरी बाजू:—देखिला श्रीहरी विश्वव्यापक मुरारी ॥ धृ० ॥ आजि हा सोनियाचा दिन । वर्षे आमुचा स्वजन । अमृत प्राशन । सर्वांसंगें समागम । प्रकटला आत्माराम । बाप रखमा देवीवरी कृपा सिंधू करुणा करी ॥ १ ॥

## MR. KRISHNARAO SHENDE. श्री. कृष्णराव शेंडे.

श्रीयुत कृष्णराव शेंडे हे श्रीसरस्वती नाटक मंडळीचे मालक असून केवळ आपल्या गायन नैपुण्यामुळें या पदास पोहोंचले आहेत. आवाजाची उत्कृष्ट देणगी त्यांना लाभली असल्यामुळें त्यांचे गायन प्रभावी ठरलें जातें.

त्यांच्या पुढील पदांचें रेकार्ड विक्रीस तयार आहे.

BX. 6 — 21–12828

P 8751 / P ८७५१ — मधुरा बिंबाधरा — शारदा
स्वार्थी जी प्रीति मनुजाची — ,,

7 — 29

पहिली बाजू:—बिंबाधरा, मधुरा, विनयादि गुणीं मनोहरा मधुरा । ती सुंदरा । विगुणावरा । घटितां विधि पी काय सुरा ॥ १ ॥

दुसरी बाजू:—स्वार्थी जी प्रीति मनुजाची सहज ती ॥ धृ० ॥ परि साधे जो स्वार्थ परार्थी, उत्तम तो गणिती ॥ स्वार्थ परार्थी इतुका असतां, मध्यम त्या म्हणती ॥ ज्यांत न जनहित त्या स्वार्थाला, साधु अधम गणती ॥

## BAI SUNDARABAI. बाई सुंदराबाई.

बाई सुंदराबाई यांची शृंगारिक गाण्यासंबंधानें फार प्रसिद्धी आहे. पहाडी आवाज, शास्त्रीय गायन व योग्य अभिनय यामुळे त्यांची रसिकावर तेव्हांच छाप पडते. रसिकांचे अत्याग्रहावरून व त्यास फार मागणी असल्यामुळें त्यांच्या दोन लोकप्रिय लावण्यांचे रेकार्ड चालू महिन्यांत विक्रीस तयार आहेत.

BX.71 17–13242
P 8752 { खुण बाळपणांत लावणी
P ८७५२ { सखे नयन कुरंग "
73 43

पहिली बाजूः—खुण बाळपणांत, आंबे बनांत, आलें माझें मनांत, पहिली ओळख गोडीची। कशी विसरेन कुरघोडीची ॥ अग वईनी मग तुझें पाहुंदे निरण वर आलय तुरण माझें उडूंदे हरण पोपट मैनेसी लढूंदे लढूं। उडी मारूं दे उडू। माजि न धरिता मनी कुस्ती जीरवीन। पतीराया साफ निरवीन वेढा देऊनी वारू फिरवीन। उत्तम थाट घाम जिरवीन ॥ अहो भावोजी तुम्हां मीं विकलें। धान्य पीकलें, बाळबोध शिकलें, घाला पुस्ती मोडीची, मला आशा तुमच्या जोडीची ॥ १ ॥

दुसरी बाजूः—सखे नयन कुरंग गोरा रंग सुरंग दे अंग संग खुप लाली टवटवती। नारीची लाली टवटवती मुलतानी कमर लवती ॥ बुरख्यांत सदा ॥ हसे गदगदा। दावी भाव अदा अली धुंद कुंद नवती। नारीची। गमले बिसनी भोवती कुसुम फुलांची थडी ग। नेसली पैठणी घडी। चमकती चोळीवर खडी। वेळ दंडामध्यें वाकडी। अग तिचा बांधा सडसडी। उभी चौका मधी फाकडी ॥



## MRS. HIRABAI. मिसिस हिराबाई.

हिराबाईचा बैठकीच्या गाण्यांचा फार मोठा लौकिक आहे. त्यांच्या कंठांतून निघालेले मंजुळ आलाप रसिकांच्या हृदयास जाऊन पोहोंचतात.

चालू महिन्यांत त्यांचीं पुढील पदें रेकार्डमध्यें घेतलीं असून विक्रीस तयार आहेत.

BX.251 17–13244
P 8753 { तारिणी नववसन पटवर्धन
P ८७५३ { मित भाषिणी "
254 45

पहिली बाजूः—तारिणी नववसन धारिणी। वात्सल्य हृदयिं धरुनि करिसी दया स्वजनीं ॥ ध्रु० ॥ तळमळे अवघी प्रजा। उत्सवीं मग्न सजा, साधितो शकुनी काजा। वैरी घर भरती स्वैर गति रमति। प्रजाजन फिरति रानीं ॥ १ ॥ भूपविसि राज्ञिपदा। होसी आदर्श सकल स्त्रीजना। स्वजन हित कारिणी ॥ २ ॥

दुसरी बाजूः—मित भाषिणी तीच कुलकामिनी। गृहिणी, रुचिर वच वदुनि भूपवि स्वकुल कुलाचार राखोनी ॥ ध्रु० ॥ केविं मिळे त्या जनीं मान्यता। अविनय ज्या वारिती वाक्पटुता। कुलकलंकिनी ठरतां वनिता... मिरविली जरी सदाचार सांडोनी ॥ १ ॥

BX.249 17–13246
P 8754 { शांतवा हो मानसा पटवर्धन
P ८७५४ { आनंद मानी मूढ मनीं "
250 47

पहिली बाजूः—शांतवा हो मानसा। क्षोभा वाया करितसा। उमटला का मनिं ठसा। द्यूत लावित गळफासा ध्रु० ॥ कां तृत झाली लालसा। डौल मिरवुनि रामसा। केवि सुचली अवदशा। धि:कारिलें सदुपदेशा ॥ १ ॥

दुसरी बाजूः—आनंद मानी मूढ मनीं। लज्जित अरिसी अधिक लाजवुनी ॥ ध्रु० ॥ हास्य विकट वदनी दाउनि जरि। शत्रू दुखविला परोपरी। वर वन्हि भडके तदंतरीं। शांत अति होई रण वंदनीं ॥

वरील चारही पदें पट-वर्धन या नाटकांतील आहेत. पहिलीं दोन पदें कृष्णाचे तोंडीं असून शेवटचीं दोन पदे द्रौपदी म्हणते. बाई हिराबाई या हीं पदें फारच बहारीनें म्हणत असतात. त्यांच्या लोकप्रियतेंत या पदांनीं चांगलीच भर पडली आहे. वरील पदें रसिकांना आवडतील अशींच आहेत.

## MR. BHAI SHANKAR GAVAYA श्री. भाईशंकर गवय्या.

श्रीयुत भाईशंकर गवय्या यांचीं हिंदी रागदारीची पदें फारच चांगलीं वठतात. त्यांच्या पुढील पदांचें रेकार्ड विक्रीस तयार आहे.

BX.485 21-12830
P 8755 ऐसी लचक चलत. हमीर
P ८७५५ मा संबत सुनावे कोयलिया. वसंत
486 31

पहिली बाजू:—ऐसी लचक चलत ब्रिजनारी ॥ धृ० ॥ बडे बडे नयन बिचक जरा । उमगे जोबन मतवारी ॥ १ ॥

दुसरी बाजू:—मा संबत सुनावे कोयलिया ॥ धृ ॥ एक तो पिया बिन जाग रहिली बिज दुजे कोडावे जीर ॥ तिजे बेरन निंद आन सतावे जनमजरिया ॥ १ ॥

## MR. SURESH BABU. श्री. सुरेश बाबू.

श्रीयुत सुरेश बाबू यांच्या हिंदी गाण्याचा लौकिक सर्वांस परिचित आहे. पहाडी आवाज व जोरदार गायन यामुळें त्यांचें गायन प्रभावी ठरतें.

यांच्या पुढील पदांचे रेकार्ड विक्रीस तयार आहेत.

BX.262 21-12832
P 8756 बाल्म मोरा नैना तेरे रसिले खमच
P ८७५६ राम अयोध्या नगरी पहाडी
263 33

## RAZAK SURAT BAND. रझाक सुरत बँड.

रझाक सुरत बँड हा सर्व हिंदुस्थानांत नांवाजलेला असून बँडच्या नैपुण्याबद्दल त्यास अनेक सुवर्ण पदकें मिळालीं आहेत. पुढील दोन अत्यंत लोकप्रिय बँडच्या रेकार्ड विक्रीस तयार आहेत.

BX.14 8-10287
P 8757 मय आतशका फवारा चलता पुर्जा
P ८७५७ चलता पुर्जा पुतला हुं मै ,,
23 88